सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास निवृत्तीवेतन व वेतनेत्तर बाबींसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक-सकबो-२०२४/प्र.क्र.३७/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-०६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. सकबो-२०२४/प्र.क्र.३७/का-१०, दि.०२.०५.२०२४.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दि.१४.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील योजना व मुख्यालयातील निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनावरील खर्चासाठी व वेतनेत्तर बाबींवरील सन २०२४-२५ च्या खर्चासाठी ₹ ३००.०० लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०२.०५.२०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

२. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ येथे "महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी कोषागारातून एकदम आहरित न करता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाची दरमहा खर्चाची / निधीची आवश्यकता तपासून खर्चाचे देयक कोषागारात सादर करावे. जेणेकरुन विनाकरण निधी महाराष्ट्र राज्य समाज कल्याण बोर्डाकडे शिल्लक राहणार नाही, याची दक्षता घ्यावी. खर्चाचे प्रयोजन नसताना सदर निधी एकत्रितरित्या आहरित करुन महाराष्ट्र राज्य समाज कल्याण बोर्डाने त्यांच्या बँक खात्यात जमा केल्यास या अनियमिततेची संपूर्ण जबाबदारी नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील" असे नमूद करण्यात आले आहे.

३. "सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांचेकरिता 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा' (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यास वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०२.०५.२०२४ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक :-**

संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०२.०५.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ वगळण्यात येत आहे. सदर परिच्छेदाऐवजी **"सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांचेकरिता 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा'** (Virtual Personal Deposit Account) **ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यास वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१२.१ मध्ये "ज्या देयकांचे आदाते अगोदरच निश्चीत झालेले आहेत (म्हणजेच देयकांव्दारे रक्कम अधिदान व**

**लेखा कार्यालय, मुंबई / जिल्हा कोषागार कार्यालय / उप कोषागार कार्यालय यांचेकडून थेट संबंधित आदात्यांना संवितरीत करण्याचे प्रस्तावित असेल) अशी सर्व देयके, अन्यथा परिपूर्ण असल्यास, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/ जिल्हा कोषागार कार्यालय/ उप कोषागार कार्यालय यांचेकडून परित केली जातील आणि प्रचलित अधिकृत ई-प्रदान प्रणालीव्दारे थेट आदात्यांना प्रदाने करण्यात येतील. अशा देयकांसाठी आभासी वैयक्तिक ठेव लेखा व व्यवस्था आणि कार्यपध्दती वापरण्यात येणार नाही.",** अशी तरतूद आहे. **त्यानुसार महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाचे आदाते (सेवानिवृत्ती वेतन धारक) अगोदरच निश्चीत झालेले आहेत. त्यामुळे वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१२.१ नुसार सदर सेवानिवृत्ती वेतन धारकांची नोंदणी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर** (BEAMS) **करुन सदर सेवानिवृत्ती वेतन धारकांना निवृत्तीवेतन प्रदान करण्याची कार्यवाही महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी तात्काळ करावी. त्याकरिता सेवानिवृत्ती वेतन धारकांची आवश्यक असलेली माहिती सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई यांनी महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावी. तसेच, 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा'** (Virtual Personal Deposit Account) **ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्याबाबत आवश्यक कार्यवाही झाल्यानंतर वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१२.२ नुसार सदर सेवानिवृत्ती वेतन धारकांची अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर** (BEAMS) **वर नोंदणी करण्याची दक्षता महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी",**

**असे वाचावे.**

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०६१६५३२२१२३० असा आहे. हा शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2024.08.06 17:07:58 +05'30'

**( साहेबराव भोये )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई,
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती, का-१०.